रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय व अधिनस्त कार्यालयासाठी संगणक यंत्रणा खरेदी करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**रोजगार व स्वयंरोजगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रोस्वरो-२०१५/प्र.क्र.०९/रोस्वरो-१**

जी.टी.हॉस्पीटल कॉम्प्लेक्स इमारत, ५ वा मजला

नवीन मंत्रालय, मुंबई-४०००01

तारीख: ०६ फेब्रुवारी, २०१५

वाचा -

१) आयुक्त,रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांचे पत्र क्र.रोस्वरां—७/संगणक/ ४१३ दि.१४ जानेवारी,२०१४

२) दि.२८ नोव्हेंबर,२०१४ रोजी पार पडलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीचे इतिवृत्त

**शासन निर्णय -**

कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या ( पूर्वीचा रोजगार व स्वयंरोजगार विभाग) दि.२८ नोव्हेंबर, २०१४ रोजी पार पडलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय व अधिनस्त कार्यालय यांच्यासाठी संगणक व त्यासंदर्भातील यंत्रणा खरेदी करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यासाठी प्रस्ताव सादर करण्यात आला. सदर बैठकीच्या इतिवृत्तास अनुलक्षून रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय व त्यांच्या अधिनस्त कार्यालयासाठी सन २००८-०९ मध्ये खरेदी करण्यात आलेल्या संगणक यंत्रणेच्या बदल्यात नवीन यंत्रणा खरेदी करण्यासाठी वित्तीय व प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांच्या दि.१४ जानेवारी,२०१५ च्या पत्रान्वये विभागास सादर करण्यात आला आहे.

२. दि.२८ नोव्हेंबर, २०१४ रोजी पार पडलेल्या विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेस अनुलक्षून रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय व त्यांच्या अधिनस्त कार्यालये यांच्यासाठी खरेदी करावयाच्या खालील नमूद संगणक व त्यासंबंधात यंत्रणेच्या खरेदीस येणा-या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | खरेदी करण्यात येणारी यंत्रणा | कोणत्या दर करारानुसार आहे | आवश्यक असलेले नग | दर करारानुसार प्रती नगाची किंमत (रुपये ) | येणारा एकूण खर्च (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| (अ) | (ब) | (क) | (ड) | (इ) | ( ड) X (इ) |
| १ | संगणक | **महाराष्ट्र शासन** | २८ | ३६,४८८/- | १०,२१,६६४.०० |
| २ | लेझर प्रिटर्स | Directorate General of Supplies & Disposals, Govt. of India | ३६ | ८,८२३.९९/- | ३,१७,६६३.६४ |
| ३ | प्रोजेक्टर्स | | १ | ४०,५९५.९१/- | ४०५९५.९१ |
| | (रुपये तेरा लाख एकोणऐंशी हजार नऊशे तेवीस आणि पंचावन्न पैसे फक्त) | | | | १३,७९,९२३.५५ |

३. सदर मान्यता शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र-१०.०८/प्र.क.७०/ २००८/ विनियम, दि.१५ मे,२००९ नुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उप-विभाग-दोन मधील अनु.२८-अ नियम क्र.७६ नुसार प्रशासनिक विभागाला असलेल्या अधिकारास अनुलक्षून व खालील अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१) उपरोक्त यंत्रणेची खरेदी विहीत कार्यपध्दतीनुसार करण्यात यावी.

२) यंत्र सामुग्री प्राप्त झाल्याखेरीज व ते निश्चित केलेल्या विनिर्दीष्टाप्रमाणे असल्याची खातरजमा केल्याखेरीज तसेच, यंत्रांच्या गुणवत्तेची खात्री पटल्याखेरीज कंपनीस रक्कम प्रदान करण्यात येऊ नये.

३)सदर यंत्रणेची नोंद संबंधित कार्यालयाच्या जडवस्तू संग्रह नोंदवहीत घेण्यात यावी.

४) उपरोक्त यंत्रणेची खरेदीही उपलब्ध निधीच्या मर्यादेत करण्यात यावी.

४. सदर खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.झेड ए-०१, प्रधान लेखाशीर्ष-२२३०-कामगार व सेवायोजन, ०२-सेवायोजना सेवा, ००१-संचालन व प्रशासन,(०२)(०१) सेवायोजन कार्यालयात संगणित्रांची पध्दती सुरु करणे, १३ कार्यालयीन खर्च (योजनांतर्गत) ( २२३०१०९२) अंतर्गत वित्तीय वर्ष २०१४-२०१५ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. तसेच, दि.२८ नोव्हेंबर,२०१४ रोजी पार पडलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीच्या इतिवृत्तानुसार पुढील यंत्रणेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | यंत्रणेचे नाव | एकुण आवश्यक नग | सदर यंत्रणेच्या खरेदीबाबत प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिलेले अभिप्राय |
|---|---|---|---|
| १ | युपीएस (१० केव्हीए युपीस Back up time १२० Mintues) | १ | केंद्रीय भांडार यांच्या दरपत्रकानुसार खरेदी करण्यास समितीने मान्यता दिली नाही. मात्र निक्सी रेट कंत्राटावर या बाबी खरेदी करता येतील काय? व त्यासाठी शासन मान्यता आहे काय ? याची विचारणा माहिती व तंत्रज्ञान संचालनालय व उद्योग विभागास करावी, असे निर्देश रोस्वरो संचालनायास देण्यात आले. शासन मान्यता असल्यास त्यानुसार खरेदी करावी अन्यथा विहीत कार्यपध्दती अवलंबून खरेदी करावी असे समितीने निर्देश दिले. |
| २ | युपीएस (५ केव्हीए युपीस Back up time १२० Mintues) | ७ | |
| ३ | लॅपटॉप | ४ | डीजीएसअॅण्डडीच्या दर करारास मुदतवाढ मिळाली असल्यास त्यानुसार खरेदी करावी अथवा राज्य शासनाच्या दरकरारावर आवश्यक स्पेसिफिकेशनशी मिळाता-जुळता लॅपटॉप उपलब्ध असल्यास त्यानुसार अथवा विहीत पध्दती ( निविदा मागवून इ.) अवलंबून खरेदी करण्यात यावी. |

६. उपरोक्त यंत्रणेची खरेदी परि.५ प्रमाणे विहीत पध्दतीचा अवलंब करुन निविदा मागवून करण्याची कार्यवाही तात्काळ सुरु करावी. तसेच सदर यंत्रणाच्या खरेदीवरील खर्च आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांना विभागप्रमुख म्हणून असलेल्या अधिकारांत व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ मधील वित्तीय मर्यादेमध्ये तसेच प्रचलित नियमातील तरतूदी व शासनाने यासंदर्भात वेळोवेळी दिलेल्या सूचना यांचे काटेकोरपणे पालन करुन करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०७१४३६०१०८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2015.02.07 14:52:16 +05'30'

**(सं.छ.तडवी)**

अवर सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५. आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकणभवन, नवी मुंबई
६. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. वित्त विभाग, व्यय-१५,मंत्रालय,मुंबई
८. नियोजन विभाग, का-१४७१,मंत्रालय, मुंबई
९. कक्ष अधिकारी (रोस्वरो-२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई -०१
१०. निवड नस्ती (रोस्वरो-१)